**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र.एसआयएस-११२२/प्र.क्र.४००/एक/पोल-७.**

मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - ८ ऑगस्ट, २०२३.

**विषय** :- "Special Infrastructure Scheme (SIS), including construction of Fortified Police Stations in LWE affected States" या योजनेखाली महाराष्ट्र राज्यासाठी मंजूर झालेल्या "Fortified Police Stations" यांचे बांधकाम करणे या योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**संदर्भ** :-
१. भारत सरकार, गृह मंत्रालय, फा. क्र.१८०१५/१५/२०२२-LWEO-II, दिनांक ३०.०८.२०२२, ७.१०.२०२२. and २१ March, २०२३
२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२१-अ/१९५/एसआयएस-योजना/१०९/२०२२, दि.२८.१२.२०२२ व २३.०१.२०२३.
३. गृह विभाग, शासन पत्र क्र.एसआयएस-१११८/प्र.क्र.४४१/पोल-७, दिनांक ७.११.२०२२.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/२१-अ/१९५/एसआयएस-योजना/१०९/२०२२, दि.२२.०५.२०२३

**शासन निर्णय :-**

भारत सरकार, गृह मंत्रालय, यांच्या "Extended Special Infrastructure Scheme (SIS), या योजनेखाली, दिनांक २५.०१.२०२३ रोजी झालेल्या प्रोजेक्ट क्लीअरन्स कमिटीच्या बैठकीमध्ये केलेल्या चर्चेच्या अनुषंगाने सुधारीत आराखडा महाराष्ट्र राज्यासाठी "14 Fortified Police Stations, SIB/SF and District Police Works" या कामांसाठी उक्त संदर्भ क्र. १ मधील दिनांक २१ मार्च, २०२३ च्या पत्रान्वये मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार पुढीलप्रमाणे आराखडयास मंजूरी दिली आहे.

| अ.क्र. | तपशिल | मंजूर रक्कम |
|---|---|---|
| १. | नक्षलग्रस्त भागातील १४ पोलीस ठाण्याचे बळकटीकरण (रु.२.५ कोटी प्रति पोलीस ठाणेच्या मर्यादेत.) | ३५,००,००,०००/- |
| २. | SIB/SF कामांसाठी | १५,६३,९०,०००/- |
| ३. | जिल्हा पोलीस कामांसाठी | ६,९१,५०,०००/- |
| | एकूण | ५७,५५,४०,०००/- |

२. उपरोक्त मंजूरीच्या अनुषंगाने पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांनी पोलीस मदत केंद्र नेंडेर, जि. गडचिरोली च्या बांधकामासाठी रु. २,४९,६७,१००/- (रुपये दोन कोटी एकोणपन्नास लाख सदुसष्ट हजार शंभर मात्र) इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक सादर केले आहे.

३. पोलीस महासंचालक यांनी सादर केलेल्या पोलीस मदत केंद्र नेंडेर, जि. गडचिरोली च्या बांधकामासाठी रु. २,४९,६७,१००/- (रुपये दोन कोटी एकोणपन्नास लाख सदुसष्ट हजार शंभर मात्र) इतक्या खर्चाच्या उपरोक्त अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून याद्वारे मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

१. भारत सरकार, गृह मंत्रालय, यांच्या “Extended Special Infrastructure Scheme (SIS), या योजनेच्या मार्गदर्शक तत्त्वांचे अनुपालन करण्यात यावे.
२. संदर्भीय क्र. १ वरील भारत सरकार, गृह मंत्रालय, क्र.१८०१५/१५/२०२२-LWEO-II, दिनांक २१ March, २०२३ यामधील शर्तींचे अनुपालन करण्यात यावे.

४. उक्त रकमपैकी केंद्र हिश्याची रक्कम “गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०५५, पोलीसांवरील भांडवली खर्च, ००, २०७, राज्य पोलीस (००) (००)(०३) नक्षलग्रस्त भागामध्ये सुसज्ज पोलीस ठाणे बांधणे (६० टक्के केंद्र हिस्सा) (अनिवार्य) (४०५५०२०५), ५३, मोठी बांधकामे”, या लेखाशीर्षाखाली आणि राज्य हिश्याची रक्कम “गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०५५, पोलीसांवरील भांडवली खर्च, ००, २०७, राज्य पोलीस (००) (००)(०४) नक्षलग्रस्त भागामध्ये सुसज्ज पोलीस ठाणे बांधणे (४० टक्के राज्य हिस्सा) (अनिवार्य) (४०५५०२१४) ५३-मोठी बांधकामे” या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून, संबंधित वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पीत अनुदानातून भागविण्यात यावे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharahstra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०८१०१४३१४४९५२९ हा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ï¿¿HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, pseudonym=D53E4970DA18F4240576F3F34F92F7E069E6A52A, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2023.08.10 14:34:17 +05'30'

**( नारायण बि. माने )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग.**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई.
२. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली, मुक्काम-नागपूर
३. पोलीस अधीक्षक, गडचिरोली/ गोंदिया.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ गडचिरोली/ गोंदिया.
८. अवर सचिव (रोख शाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी (व्यय-७/अर्थ-११/अर्थोपाय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड फाईल (पोल-७).